न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयातील सहायक संचालक, गट-अ, पदावरील कार्यरत अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय बदलीबाबत - सन २०२५.

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन आदेश क्रमांक: एफएसएल-०४२५/प्र.क्र. १९१/पोल-०४,**

मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक: ३० मे २०२५.

वाचा: महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

**शासन आदेश:**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चा नियम ४ (३), (४) व ५ (२) मधील तरतुदीनुसार शासन मान्यतेनुसार **"सहायक संचालक, गट-अ"** या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या, त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ. क्र. | कार्यरत अधिकाऱ्यांचे नाव व प्रयोगशाळा | सध्याची पदस्थापना | बदली नंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री. गो. बा. सरोते | नाशिक | **नागपूर** |
| २ | श्रीमती वै. भु. महाजन, | नागपूर | **अमरावती** |
| ३ | श्रीमती अं. प्र. खराडे | पुणे | **मुंबई** |
| ४ | श्रीमती शु. न. देवणीकर | नांदेड | **पुणे** |
| ५ | श्रीमती ज्यो. प्र. दिवटे | पुणे | **मुंबई** |
| ६ | श्री. वै. र. देशपांडे, | छत्रपती संभाजीनगर | **नाशिक** |
| ७ | श्रीमती श. स. कुळकर्णी | अमरावती | **नागपूर** |
| ८ | श्रीमती गि. प्रि. मोरे | मुंबई | **कोल्हापूर** |
| ९ | श्रीमती मि. मा. तोडकर, | नागपूर | **छत्रपती संभाजीनगर** |
| १० | श्री. रो. दि. शिंदे | नाशिक | **पुणे** |

२. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. बदली आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

अ) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यांनतर बदली झालेल्या संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदावरुन कार्यमुक्त करावे. सदर अधिकारी कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. सदर अधिकाऱ्याला रुजू करुन न घेतल्यामुळे काम न देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्ता देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीत अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

ब) संबंधित अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबतचा अहवाल शासनास तातडीने सादर करण्यात यावा.

३. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

४. संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अनुपालन अहवाल संचालनालयामार्फत शासनास न चुकता सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१९३७५१५२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHIKAN ONKAR THAKUR

Digitally signed by BHIKAN ONKAR THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Home Department, 2.5.4.20=CB64A92FFB1A1FC675B87B99D133C8E4FFED848F8EC9727D5082EB07DBBE3343, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2CF77A3A2916BE200D3D9A0961DF4F9F77CC14E167C7FCEC2EA903E779A2239A, cn=BHIKAN ONKAR THAKUR
Date: 2025.05.30 19:38:46 +05'30'

**( भिकन ठाकूर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. मा. मुख्यमंत्री (गृह), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (अ. व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई.

प्रत संग्रहार्थ:

कार्यासन पोल-४, गृह विभाग.